


इंडियन इन्स्टिटचूट ऑफ एज्युकेशन
१२८।२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९

# पशुजीवन

## १

शैलजा ग्रव



# पशु-जीवन
# १

लेखिका :
**शैलजा रॉबर्ट ग्रब**
निसर्गअभ्यास नियोजक
बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी




**इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन**
**१२८/२, कर्वे रस्ता, कोथरूड, पुणे ४११ ०२९**

* पशु-जीवन

* पहिली आवृत्ती : मार्च १९८४

* संपादक / प्रकाशक :
**डॉ. चित्रा नाईक**



* मुखपृष्ठ : **मधु पाटील**

* किंमत : **दोन रुपये**

* मुद्रक :
**चं. ह. जोशी,**
सकाळ प्रिंटिंग प्रेस,
५९५ बुधवार पेठ, पुणे ४११ ००२

# प्रस्तावना

नव्याने साक्षर झालेले प्रौढ आणि मुले म्हणजे स्वतंत्रपणे ज्ञान मिळविण्यासाठी सिद्ध झालेल्या व्यक्ती असतात. हे ज्ञान वाचनाद्वारे मिळविताना त्यांची साक्षरता अधिक खोलवर रुजू लागते आणि ज्ञान-साधनेचा आनंदही त्याच वेळी लाभतो. अशा नववाचकांसाठी साहित्य-निर्मिती करणे, हे इन्स्टिटयूटच्या अनौपचारिक शिक्षण साधनकेंद्राचे एक महत्त्वाचे काम आहे. असे साहित्य समजायला सोपे, उपयुक्त आणि रंजक झाले तरच नववाचकांना ते आकर्षक वाटेल. त्याची जाणीव असल्याने, साधनकेंद्र त्या दिशेने प्रयत्न करीत असते; आणि नववाचकांसाठी करावयाची साहित्यनिर्मिती, हा एक संस्कृतिसंवर्धनाचा आणि समाजपरिवर्तनाचा महत्त्वाचा प्रयोग आहे असे मानते.

माणूस आणि निसर्ग हे एकमेकांचे साहाय्यकारी नातेवाईक आहेत. पण माणसाला ह्याचा कधी कधी विसर पडतो आणि निसर्गाची उपेक्षा करून तो स्वतःचेच जीवन रूक्ष आणि दरिद्री करून ठेवतो. अशा विपरीत प्रवृत्तीला आवर घालायचा असल्यास माणसाला निसर्गाचे सौंदर्य, त्याचे वैविध्य आणि उपयुक्तता ह्याची जाणीव अविरत करून दिली पाहिजे. त्या दृष्टीने साधनकेंद्राने निसर्गाच्या विविध स्वरूपांवर– प्राणी, पक्षी, वनस्पती, परिसराचे विज्ञान इत्यादी विषयांवर– पत्रिका आणि पुस्तिका योजल्या आहेत. त्यांतील पक्षीजीवनावरील दोन पुस्तिका आणि पाण्यातील प्राणी ह्या पुस्तिका यापूर्वीच प्रसिद्ध झाल्या आहेत. तसेच धान्ये, सूर्यमाला, पाणी इत्यादींवरील पत्रिकाही प्रसिद्ध झाल्या आहेत. आता 'पशु-जीवन' ह्या दोन पुस्तिका नववाचकांच्या हाती देत आहोत. निसर्गाचे ज्ञान व निसर्गावरील प्रेम वाढविण्याला त्या साहाय्य करतील असा विश्वास वाटतो.

श्रीमती शैलजा ग्रब ह्यांनी निसर्गमैत्रीच्या सहजतेने लिहिलेल्या ह्या पुस्तिका प्रकाशित करताना आम्हाला विशेष आनंद वाटतो.

**–चित्रा नाईक**

## अनुक्रमणिका



# १ वाघ

वाघ म्हटला म्हणजे आपल्या डोळ्यांसमोर एक मोठ्ठा बलवान प्राणी उभा राहतो. त्याचबरोबर त्याचा दरारा, शक्ती आणि क्रूरता डोळ्यांसमोर येते. त्याला जंगलात पाहाण्याची आपली हिंमत नाही. पण सर्कशीत, नाहीतर प्राणिसंग्रहालयात आपण त्याला पाहिला असेल. तो जंगलचा राजा आहे. सर्व प्राणी वाघ-सिंहांना भितात. वाघ हा आपल्या भारताचा ' राष्ट्रीय प्राणी ' म्हणून मानला आहे.

पूर्ण वाढलेल्या वाघाची लांबी साधारणतः तीन ते साडे-तीन मीटर असते. मादी थोडी लहान असते. वाघाचे वजन सुमारे १७५ ते २२५ किलोग्रॅमपर्यंत भरते.



वाघाचा रंग पिवळा असून त्यामध्ये थोडी केशरी झाक असते. त्याच्या अंगावर उठावदार पट्टे आणि बारीक केस असतात.

वाघाला राहावयाला हिरवीगार दाट जंगले आवडतात. महाराष्ट्रात अकोला, अमरावती, भंडारा व चंद्रपूर ह्या जिल्ह्यांमध्ये वाघ आढळतात. हरणे, सांबरे आणि त्यासारख्या मोठ्या प्राण्यांची शिकार जेथे मिळू शकेल, विश्रांती घेण्यासाठी थंड निवाऱ्याची जागा जेथे असेल, आणि तहान भागविण्यासाठी भरपूर पाणी जेथे मिळेल ती जागा वाघ राहण्यासाठी पसंत करतो. वाघांना दुपारचे ऊन सहन होत नाही; त्यामुळे ते संध्याकाळी ऊन खाली गेल्यावरच शिकार करण्यासाठी बाहेर पडतात. वाघ हरणे, सांबरे याप्रमाणे रानडुकरे, गवे, गाई-म्हशी हे प्राणी देखील खातो. ज्या ठिकाणी मोठमोठे रानटी प्राणी मुबलक संख्येने मिळू शकत नसतील तेथे गावकऱ्यांची रानात चरावयास सोडलेली गाई-गुरे वाघ पळवून नेतात. रानटी प्राण्यांपेक्षा ही पाळीव जनावरे मारावयास सोपी असतात. ही सवय वाघांना लहानपणापासूनच त्यांच्या आई-वडिलांचे पाहून लागलेली असते. खावयास काहीच मिळाले नाही तर तो गावातील एकटीदुकटी माणसे देखील अलगद उचलून नेतो व खातो. वाघ शिकार करताना कुशलतेने हालचाली करतो. जनावर आटोक्यात येईपर्यंत दबा धरून बसतो व जवळ येताच त्यावर सफाईने झेप टाकतो. वाघाचे शरीर जरी लांब व वजनदार असले तरी त्याच्या हालचालीत फारच चपळता असते. वाघ पाण्यामध्ये सफाईदारपणे पोहू शकतो. वाघाचे आयुष्य साधारणतः २० वर्षे असते.



काही वाघांच्या कातडीचा रंग पिवळा असून त्यावर बांगडीसारख्या काळ्या रंगाच्या गोल गोल जाड खुणा असतात. याला बिबळ्या वाघ म्हणतात. कित्येकजण त्याला 'बिबट्या' म्हणूनही ओळखतात. बिबळ्या वाघ कुठेही व कशाही परिस्थितीत राहू शकतो. पट्टेवाल्या वाघाप्रमाणे त्याला राहावयाला अगदी दाट जंगलेच लागतात असे नाही. तो उघड्या माळरानावरही, खडका-कपारीत, तसेच साधारण जंगलातही राहू शकतो. बिबळ्या निशाचर असला तरी त्याला रात्रीची शिकार मिळू शकली नाही तर दिवसा उजेडी देखील तो शिकारीस निघतो. याचे मुख्य कारण म्हणजे तो दुपारचे कडक ऊनदेखील सहन करू शकतो. बिबळ्याला त्याच्या आवाक्यातले कोणतेही जनावर चालते. परंतु माकडे, वानरे हे त्याच्या विशेष आवडीचे प्राणी आहेत. हा वाघ हरणे, नीलगाई, रानडुकरे, अस्वले, मोठमोठ्या सायाळी, इतकेच काय, वेळ आली तर दुसऱ्या वाघालादेखील ठार मारून खातो. भुकेच्या वेळेस त्याला काही शिकार मिळाली नाही तर तो कोंबड्या, मासे, सरपटणारे प्राणी हे देखील खातो. काहीच न मिळाल्यास कधी कुठे पडलेले शिळे कुजके मासदेखील त्याला चालते. बिबळे वाघ झाडांवर सरसर चढू शकतात.

❊

# २ सिंह

वाघासारखाच जंगलातील दुसरा बलवान आणि शक्तिवान प्राणी आहे सिंह. वाघ-सिंहांचा जंगलात जबरदस्त दरारा असतो. हे जंगलचे राजेच आहेत. जंगलातल्या इतर सर्व प्राण्यांना त्यांची भीती वाटते. सिंहाची गर्जना ऐकली की हरणे, ससे, नीलगाई, काळवीट हे थरथर कापतात. ह्या बलशाली प्राण्यांना जंगलातील सर्वच प्राणी भितात.

सिंह भारताप्रमाणेच आफ्रिकेतील जंगलातूनही आढळतात. परंतु भारतीय सिंह आणि आफ्रिकन सिंह यात थोडा फरक आहे.

पूर्ण वाढलेला सिंह साधारणतः अडीच-पावणे तीन मीटर लांब भरतो. सिंहाचा रंग मातकट, मळकट-पिवळा असतो. नराच्या मानेवर असलेल्या आयाळीमुळे तो जास्त भारदस्त व रुबाबदार वाटतो. मादीच्या मानेवर केस नसतात. सिंह त्याच्या





आयाळीमुळे जास्त भीतीदायक दिसतो. परंतु तो वाघाइतका निर्दय व क्रूर दिसत नाही. सिंह जरी इतर प्राणी मारून खात असला तरी तो वाघासारखा अतिक्रूर व कपटी वाटत नाही. त्याच्या डोळ्यांत एक प्रकारची राजेशाही चमक दिसते. असे असले तरी सिंहसुद्धा क्रूर प्राणीच आहे.

पूर्वी सिंह जवळजवळ सर्व उत्तर भारतात आढळत असत. परंतु माणसाने त्यांची फार मोठ्या प्रमाणावर हत्या केली. त्यामुळे आजमितीला त्यांची संख्या फारच कमी झाली आहे. आता ते फक्त गुजरात राज्यातील गीरच्या जंगलातच आढळतात. गीरच्या जंगलात साग, बाभळी, पळस, जांभूळ, बोरी यांची झाडे मोठ्या प्रमाणावर आहेत. तेथे मधूनमधून बांबूची झाडेही आढळतात. करवंदी-बोरीच्या दाट जाळ्या दिसतात. अशा खुरट्या झुडपांच्या दाट जाळ्या सिंहांना दिवसा लपून राहण्या-साठी फारच उपयोगी पडतात. सिंह कडक उन्हाचा ताप सहन करू शकतो. त्यामुळे राहण्यासाठी अशीच उघडी माळराने सिंहांना पसंत पडतात. सिंहाला वाघाप्रमाणे दाट हिरवीगार जंगले विशेष आवडत नाहीत. सिंह जरी गुहेत राहत असले तरी ते नेहमीच दिवसा गुहेत असतात, असे नाही. ते जंगलातून भटकत असतात. जेव्हा त्यांना विश्रांती घ्यावीशी वाटते तेव्हा ते करवंदाच्या अथवा इतर खुरट्या झुडपांच्या दाट जाळ्यांच्या सावलीत लपून विश्रांती घेतात.

सिंहाला एकट्याने राहणे आवडत नाही. नेहमी सिंहाचे कुटुंबच्या कुटुंब दृष्टीस पडते. यात एक नर, एक किंवा दोन माद्या आणि तीन-चार छावे असतात. छोट्या छाव्यांच्या अंगावर गोल गोल ठिपके किंवा पट्टे असतात. छावे जसजसे मोठे होतात तसे हे ठिपके हळूहळू नाहीसे होतात. गीरच्या

जंगलात सिंहांना हरणे, सांबरे, काळवीट किंवा तेथे राहत असलेल्या लोकांची पाळीव गाईगुरे खावयास मिळतात. नर, माद्या आणि छावे मिळून शिकार करतात. परंतु शिकार करण्याचे काम सहसा माद्याच करतात. भक्ष्याचा पाठलाग करून भक्ष्य आटोक्यात आल्यावर त्यावर झडप घालून एकदम नरडेच आवळून प्राण्याला ठार मारतात. नंतर शिकार ओढून आणून आडोशाला ठेवतात. त्यानंतर मात्र भक्ष्याचा पहिला मानकरी असतो नर. तो मारलेल्या प्राण्याच्या ढुंगणापासून चावे घेऊन शिकार खावयास सुरुवात करतो. त्याचे पोट भरल्यावर छावे व माद्या शिकार खातात. यावरूनच 'सिंहाचा वाटा' हा शब्दप्रयोग आलेला आहे.

भारतीय सिंहाची आयाळ आफ्रिकन सिंहापेक्षा लहान असते. परंतु भारतीय सिंहाची शेपटी झुपकेदार असून त्याच्या गुडघ्यांवर केस असतात. त्यामुळे तो देखील आफ्रिकन सिंहा-इतकाच भारदस्त दिसतो. भारतीय सिंहिणीच्या पोटाला एक घडी असते तर आफ्रिकन सिंहीण उभी असताना तिच्या पोटाला दोन घड्या पडतात.

सिंहीण साधारणतः ३ वर्षांची व सिंह ५ वर्षांचा झाला की वयात येतात. जानेवारी-फेब्रुवारी महिन्यात सिंहिणींना छावे होतात. सिंहाचे आयुष्य वाघाइतकेच म्हणजे २० वर्षांपर्यंत असते.



# ३ हत्ती

आपल्या जंगलात अनेक प्रकारचे पशुपक्षी दिसून येतात. आपल्या जंगलातून दिसणारा एक वैशिष्टचपूर्ण प्राणी म्हणजे हत्ती. भारतात उत्तरप्रदेश, बिहार, ओरिसा, म्हैसूर, आसाम, केरळ आणि तामिळनाडू या राज्यांत हत्ती मोठ्या प्रमाणावर आढळतात.



हत्तीची उंची सव्वातीन ते साडेतीन मीटरपर्यंत भरते. काळा रंग, लांब सोंड, भले मोठे खांबासारखे पाय, सुपासारखे कान व अगदी बारीक डोळे यावरून हत्ती सहज ओळखता येतो. भारतीय हत्तींमध्ये फक्त नरालाच मोठमोठे सुळे असतात. मादीला सुळे नसतात. क्वचित एखाद्या नराला सुळे नसतात. सुळे नसलेल्या नराला 'माखना' म्हणतात. आफ्रिकेत सापडणाऱ्या हत्तीच्या नराला व मादीला दोघांनाही मोठमोठे सुळे असतात. तसेच भारतीय हत्तीची पाठ फुगीर असते तर आफ्रिकन हत्तीची पाठ खोलगट असते. हत्तीचे शरीर अवाढव्य

असते. त्याचे वजन ५ ते ६ टन असते. हत्ती पाण्यात चांगले पोहतात.

इतर जंगली जनावरांपेक्षा हत्तींना जास्त बुद्धी असते. त्यामुळे हत्तींना शिकवून त्यांच्याकडून अनेक प्रकारची कामे करवून घेता येतात. याकरिता हत्तीचे छोटे बछडे पकडून त्यांना लहानपणापासूनच शिक्षण द्यावे लागते. जंगलात लाकडे कापावयाच्या गिरणीत मोठमोठी झाडे कापून लाकडाचे ओंडके बनवितात; अशा ठिकाणी शिकविलेले हत्ती ओंडके सोंडेत धरून किंवा पायाने ढकलत ढकलत वाहून नेतात. वाहून आणलेले ओंडके ते नदीच्या पाण्यात टाकतात. मग ते ओंडके पाण्याबरोबर नदीच्या एका किनाऱ्यावरून दुसऱ्या किनाऱ्यावर किंवा खाली वाहात जातात. शिकविलेले हत्ती गाड्या ओढतात. पूर्वीच्या काळी हत्तींचा उपयोग लढाईसाठीसुद्धा होत असे. हत्तींवर बसून लढाया करीत. हत्तीच्या पाठीवर अंबारी बांधून त्यात बसून राजे-महाराजे आणि श्रीमंत लोक प्रवास करीत असत. तसेच अंबारीतून मिरवणुका काढीत. हल्लीच्या काळी हत्तींना शिकवून सर्कशीत त्यांच्याकडून कामे करवून घेतात. ते सर्कसमध्ये अनेक प्रकारची कामे करतात. हत्ती मेल्यावर हत्तीचे दात काढतात. त्यांना हस्तिदंत म्हणतात. हस्तिदंतांना खूप मागणी असते. वेगवेगळ्या प्रकारचे दागिने, दागिने ठेवण्याच्या पेट्या, शोभेच्या वस्तू, पेपरवेट, फुलदाण्या, बांगड्या, बटने इत्यादी हस्तिदंतापासून तयार करतात.

हत्ती जंगलात कळपाने राहतात. एकेका कळपात ७–८ पासून २०–२५ पर्यंत हत्ती असतात. कळपात प्रामुख्याने २–३ मोठ्या माद्या आणि बच्चे असतात. नर कळपात नसतात. कळपात जसे मध्यम वयाचे बच्चे असतात तसे अगदी लहान



बछडेदेखील असतात. कळपाचे नेतृत्व म्हाताऱ्या अनुभवी मादीकडे असते. तिच्या आज्ञेत सर्व कळप असतो. केव्हा केव्हा तीन-चार नर एकत्र येऊन कंपू करून राहतात. वयात आलेले नर आणि वयात आलेली मादी दोघेही ठराविक मोसमात मदावर किंवा माजावर येतात. त्यांना 'मदमस्त' किंवा 'मस्त हत्ती' असे म्हणतात. मदमस्त हत्ती फारच बेभान बनतो. हत्तीच्या डोक्याला गंडस्थळ म्हणतात. मदमस्त हत्तीच्या गंडस्थळातून पातळ रस वाहू लागतो. या रसाला मद म्हणतात. माजावर आलेले हत्ती उगाचच मोठमोठे वृक्ष मुळासकट उपटून फेकून देतात. माजावर आलेल्या हत्तींच्या तावडीत कोणी सापडल्यास त्याची धडगत नसते. मद ओसरल्यावर मात्र तो पूर्वीप्रमाणे शांत बनतो.

हत्तीण २२ महिन्यापर्यंत गाभण राहते. एका वेळेस तिला एकच पिलू होते. क्वचित दोन देखील होतात. नुकत्याच जन्मलेल्या पिलाचे वजन ९० किलोग्रॅमच्या आसपास असून त्याची उंची सुमारे एक मीटर असते. पिलू जन्मल्याबरोबर लगेचच चालू लागते आणि कळपात सामील होते.

हत्ती मुख्यतः गवत, झाडपाला, पाने, फळे, फुले खातात. ऊस हे हत्तीचे आवडीचे खाद्य. त्याचबरोबर नारळ, केळीदेखील त्याला आवडतात. हत्ती सर्व खाद्यपदार्थ सोंडेने उचलून तोंडात धरतो. ह्या लांब सोंडेचा त्याला हातासारखा उपयोग होतो. हत्तींना पाण्यात डुंबावयास फार आवडते. पाण्यात असतानादेखील ते सोंडेत पाणी घेऊन फवाऱ्यासारखे डोक्यावर सोडतात. हत्तीची छोटी पिले कित्येकदा सोंडेत पाणी घेऊन एकमेकांवर फवारण्याचा खेळ खेळतात. सोंड हे हत्तीचे नाक आहे. ते सोंडेने श्वासोच्छ्वास करतात. हत्तीची सोंड आणि कान फारच

मोठे असतात. त्यामुळे हत्तीला त्याच्या शत्रूच्या अंगाचा वास लांबूनच येतो. तसेच शत्रूच्या हालचालीमुळे झालेला आवाजही दुरूनच ऐकू येतो. त्यामुळे शत्रू दूर असला तरी त्याची चाहूल हत्तीला लागते. हत्ती ७० ते ८० वर्षे जगतो.



# ४ रानडुक्कर

आपण पाळीव डुकरे पाहिली असतील. रानडुक्कर पाळीव डुकरासारखे नसते. ते फारच वेगळे असते. महाराष्ट्रात जंगलातून दिसून येणारी रानडुकरे आकाराने खूप मोठी असतात. त्यांच्या अंगावरील केस मोठे, राठ व रखरखीत असतात. चांगल्या पूर्ण वाढलेल्या नराची उंची सुमारे एक





मीटर असते. त्याचे वजन २२५ ते २५० किलोग्रॅम पर्यंत भरते. त्याचे शेपूट फारच आखूड असते.

नराचे सुळे फार मोठे असतात. ते बाहेर आलेले असतात. हे सुळे पंचवीस ते तीस सेंटिमीटर बाहेर आलेले असतात. रानडुकरांचा रंग मातकट राखाडी असतो. त्यांच्या अंगावर काळसर रंगाचे जाड आणि राकट केस असतात. नराच्या मानेवर असल्याच जाड आणि राकट केसांची आयाळ असते. डुकराच्या पिलांच्या कातडीचा रंग मातकट असतो. नुकत्याच जन्मलेल्या पिलांच्या अंगावर गडद, फिक्कट रंगाचे काळसर पट्टे असतात. पिले जसजशी मोठी होत जातात तसतसे ते पट्टे नाहीसे होतात.

महाराष्ट्रात रानडुकरे सर्वत्र दिसतात. रानडुकरांना राहावयाला गवत आणि खुरटचा विखुरलेल्या झुडपांची जंगले चालतात. पावसाळचानंतर वाढलेल्या उंच पिकांमध्येही ती राहतात. डुकरांना कोणत्याही प्रकारचे अन्न चालते. कोणतीही पिके, झाडाझुडपांची पाने, फुले, फळे, मुळे आणि कंद, किडे, कीटक, साप, सरडे सर्व काही ती खातात. त्यांना कुजके सडलेले मासही चालते. डुकरे जे मिळेल त्यावर तोंड चालविताना दिसतात. त्यांचे दात काही प्रमाणावर झिजले गेले की नंतर त्यांना कठीण ठेपरे येतात. त्यांची वरची बाजू फुगीर असते; त्यामुळे ते पुढे आणखी झिजत नाहीत.

रानडुकरे सकाळी किंवा संध्याकाळी खाद्याकरिता बाहेर पडतात. जेथे माणसांचा वावर असतो तेथे ती रात्री बाहेर पडतात. ती उभ्या पिकांची फारच नासाडी करतात. पिकांमध्ये डुकरे एकदा शिरली की त्यांना हुसकावणेदेखील फार कठीण असते. त्यामुळे पिकांची फार हानी होते.

डुकरांचे नाक फार तिखट असते. त्यांना कशाचाही वास सहज येतो. डोळे आणि कान त्यामानाने कमजोर असतात. वासावरून त्यांना शत्रूचा अचूक मागोवा लागतो. रानडुकर शरीराने बोजड असते. बोजड शरीराच्या मानाने ते खूप जोरात पळते. परंतु त्याचा दम कोता असतो. ती सतत फार वेळ पळू शकत नाहीत.

रानडुकरे फार ताकदवान असतात. जंगलात केव्हा केव्हा त्यांची वाघासारख्या मोठ्या बलवान शत्रूबरोबर समोरासमोर गाठ पडते. रानडुक्कर वाघाशी मोठ्या धैर्याने झुंजते. वाघ आणि रानडुकरांच्या झुंजीत कधी कधी रानडुकराने वाघाला ठार मारल्याचे शिकारी सांगतात.

डुकरांच्या विणीचा ठराविक असा हंगाम नसतो. वर्षभरात त्यांना केव्हाही पिले होतात. डुकरीण सुमारे चार महिन्यांपर्यंत गाभण राहून विते. एका वेळेस तिला ४ ते ८ पिले होतात. छोटया पिलांना ती गवतात किंवा गवताच्या गंजीत लपवून ठेवते. हळूहळू पिले मोठी झाली की आईबरोबर फिरू लागतात.

कित्येक लोक रानडुकरांची शिकार करून त्यांचे मांस खातात. रानडुकरांचे मांस चविष्ट असते.

रानडुकरांचे आयुष्य सुमारे ८ वर्षांपर्यंत असते.



# ५ कोल्हा

कोल्हा हा प्राणी कोणाच्या ओळखीचा नाही? कोल्ह्याच्या कावेबाजपणाच्या कित्येक गोष्टी आपण ऐकल्या आहेत. इसाप नावाच्या लेखकाने इसापनीती नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यात कोल्ह्यावर कितीतरी गोष्टी आहेत. संस्कृतमध्ये पण कोल्ह्याच्या खूप गोष्टी लिहिल्या आहेत. कोल्ह्याइतका लबाड अन् चतुर असा दुसरा प्राणी सापडणे कठीण. त्याच्या चातुर्याच्या अनेक गोष्टी आपल्याला माहीत आहेत. कोणी कोल्हा पाहिला नसला तरी कोल्हेकुई ऐकली असेल. दिवस मावळल्यावर आणि पहाटे कोल्हेकुई ऐकू येते. एक कोल्हा ओरडू लागला की त्याला दुसरा-तिसरा कोल्हा साद देऊ लागतो. हळूहळू शिवारात कोल्हेकुई सुरू होते.



कोल्हा, कुत्रा, लांडगा हे सर्व प्राणी एकाच प्रकारचे आहेत. त्यांच्या तोंडातील दातांची आणि जबड्याची ठेवण,

शरीराचा आकार, खाण्या-पिण्याच्या सवयी साधारणतः सारख्याच असतात. कोल्हे आकाराने लांडग्यांहून खूपच लहान असतात. कोल्हयांच्या चेहऱ्यावर लांडग्यांसारखा क्रूरपणा व निष्ठुरपणा फारसा दिसत नाही. कोल्हयाचा रंग उदी किंवा तपकिरी असतो.

कोल्हे सर्व प्रकारच्या जंगलात राहतात. ते हिरव्यागार जंगलात तसेच उघडया माळरानावर कुठेही दिसतात. शेती-भातीच्या आसपासदेखील आढळतात.

कोल्हे संध्याकाळ झाली की लपतछपत शिकारीस बाहेर पडतात. ढगाळ अथवा थंड वातावरण असेल तेव्हा ते सबंध दिवसभरही भक्ष्याच्या शोधात भटकतात. उन्हाच्या तसेच दुपारच्या वेळी त्यांना आडोशाच्या जागा सोईस्कर वाटतात. पण मधूनमधून तहान भागविण्यासाठी ते बाहेर पडतात.

कोंबडी, बदके, तित्तर हे कोल्हयाचे आवडीचे खाणे. तसेच कोल्हे खेकडयांच्या बिळांत आपली शेपटी घालून खेकडे पकडण्यात मोठे तरबेज असतात. शेपटी बिळात घातली की आत असलेल्या खेकडयाला वाटते, की काहीतरी खाद्य आहे. खाद्य समजून खेकडा कोल्हयाची शेपटी पकडतो. त्याबरोबर कोल्हा आपले शेपूट बिळातून झटकन बाहेर काढतो आणि खडकावर जोरात आपटतो. त्यामुळे खेकडा अर्धमेला होतो. मग कोल्हा लगेच खेकडयाला मटकावितो. माणसांच्या वस्ती-जवळचे कोल्हे नियमितपणे कोंबडया, बदके, शेळयामेंढयांची करडे आणि कोकरे पळविण्यात सोकावलेले असतात. कोल्हे सरडे आणि कीटकसुद्धा खातात. माणसांच्या वस्तीजवळचे कोल्हे मेलेले प्राणी व मलमूत्र खातात. त्यामुळे कोल्ह्याकडून वस्तीजवळची सफाई आपोआपच होते.



साधारणतः कोल्हे एकटे किंवा जोडीजोडीने फिरतात. पण जंगलात त्यांच्या लहान लहान टोळया दिसतात. ते जेव्हा टोळया-टोळयांनी फिरतात तेव्हा छोटया छोटया हरणांची, काळविटांची किंवा अशाच छोटया प्राण्यांची शिकार करतात. हंगामामध्ये त्यांचा मोर्चा कलिंगडे आणि ऊस यांकडे वळतो. कोल्ह्यांना बोरेदेखील आवडतात.

कोल्ह्यांच्या विणीचा हंगाम नसतो. कोल्ह्यांना वर्षभरात केव्हाही पिले होतात. पिले मादीबरोबर फिरण्याइतकी मोठी होईपर्यंत पिलांचे आईवडील पिलांना झाडाच्या ढोलीत, खाचाखळग्यात किंवा खडकाच्या कपारीत लपवून ठेवतात.

कोल्ह्याचे सर्वसाधारण आयुष्य १२ वर्षांपर्यंत असते.



## ६ लांडगा



आपण कोल्ह्याच्या चतुरपणाच्या आणि कावेबाजपणाच्या गोष्टी वाचल्या आहेत. लांडग्याच्या लबाडीच्या अनेक गोष्टी आहेत. कोल्हा कावेबाज आहे आणि लांडगा लबाड आहे, असे लोक मानतात.

लांडगा, कुत्रा आणि कोल्हा हे तिन्हीही प्राणी सारखे दिसतात. तोंडाकडे निमुळते होत आलेले लांबोडके डोके, उभट कान, झुपकेदार शेपूट आणि बारीक पाय अशी त्यांच्या शरीराची ठेवण असते. यामध्ये कोल्हा आकाराने सर्वांत लहान, कुत्रा त्याहून थोडा मोठा अन् लांडगा सर्वांत मोठा असतो.

लांडग्यांना राहावयाला हिरवीगार तसेच पानझडी वृक्षांची दाट अरण्ये आवडतात. लांडगे अरण्याच्या घनदाट भागात राहतात. लांडगा ६० ते ७५ सेंटिमीटर उंच असतो. लांडग्याचे वजन २० ते ३० किलोग्रॅम भरते. लांडग्याच्या अंगाचा रंग वाळूच्या रंगाचा असतो. पाठीमागे तो थोडा गडद काळसर असतो.

महाराष्ट्रात लांडगे उघडया माळरानावरसुद्धा आढळतात. उन्हाळयाच्या दिवसात ते वाळूमधील गुहांमध्ये राहून कडक उन्हापासून आपला बचाव करतात. ते घळीतसुद्धा थंड ठिकाणी बसतात. लांडगे दिवसा व रात्री केव्हाही शिकार करतात. ते ज्या जंगलात राहतात त्या जंगलात मिळेल त्याची शिकार करतात. त्यांच्या राहण्याच्या ठिकाणापासून मनुष्यवस्ती जवळपास असेल आणि इतर काही भक्ष्य सहजासहजी मिळण्यासारखे नसेल, तर ते माणसांची पाळलेली जनावरे, गाईगुरे पळवितात. एखादे वेळेस जवळपास कोणी मोठे माणूस नसल्यास आणि एकटे दुकटे मूल कोठे दिसल्यास त्याला लांडग्यांनी पळविल्याचे पेपरात छापून येते. केव्हा केव्हा अशा सोकावलेल्या लांडग्यांचा गावातील लोकांना फार त्रास होतो. दाट जंगलामध्ये जेथे हरणे, भेकरे, सांबरे असतात तेथे या प्राण्यांना मारून लांडगे त्यांचे मांस खातात. अशा जंगलात कित्येक प्रकारचे पक्षीदेखील मारून खाण्यास लांडग्यांना मिळतात.



लांडगे साधारणतः कळपा-कळपाने राहतात. एकेका कळपात सुमारे तीन-चार कुटुंबे असतात. त्यांच्यातील सर्वांत वयस्कर नराकडे कळपाचे नेतृत्व असते. कळपात असल्यावर ते हरणे, सांबरे अशा मोठ्या जनावरांची शिकार करतात. लांडग्यांच्या माद्या पावसाळा सरतासरता गाभण राहतात आणि डिसेंबरमध्ये त्यांना पिले होतात. एका वेळेस तीन ते नऊपर्यंत पिले होतात. नवीन पिलांचे डोळे जन्मतःच बंद असतात. सुरुवातीला पिले आईच्या दुधावरच वाढतात. लवकरच ती आपल्या अंगातील शिकारी रक्त दाखवू लागतात.

❊

## ७ तरस

पक्ष्यांत जसे गिधाड मेलेल्या प्राण्यांचे सडके-कुजके मांस खाते, तसे प्राण्यांत तरस मेलेल्या प्राण्यांचे सडके-कुजके मांस खाते.

तरस साधारण कुत्र्यासारखा दिसतो. त्याचे पुढील अंग आणि डोके जाड आणि मागील शरीर निमुळते होत गेलेले असते. त्यामुळे हा प्राणी सहज ओळखायला येतो. याचे मागचे पाय अगदीच बारीक आणि हडकुळे असतात. त्याच्या मानेवर आयाळीसारखे लांब केस असतात. शरीराचा रंग मळकट पांढरा, उदी अथवा राखी असून अंगावर आडवे पट्टे असतात. पायांवरदेखील आडवे पट्टे असतात. हिवाळ्यात ह्या प्राण्याला मोठमोठे दाट केस उगवतात. तेव्हा हे पट्टे उठून दिसत नाहीत. ह्या दाट केसांमुळे थंडीपासून त्यांचे संरक्षण होते.

तरसाला राहायला साधारणतः उघडी, सुकी, रखरखीत तसेच खुरट्या गवताची जंगले आवडतात. त्याचप्रमाणे खडक असलेले पर्वत, जंगले आणि नालेसुद्धा त्यांना आवडतात. केव्हा केव्हा ते सायाळींनी खोदलेल्या मोठमोठ्या बिळांमध्ये जाऊन राहातात तर केव्हा अशी बिळे किंवा गुहा ते स्वतः खोदतात. मोठमोठ्या घळीतही थंडाव्याला ते पडतात.



तरस भटका प्राणी आहे. त्यांचे अन्न ठराविक प्रकारचे नसते. मिळतील त्या प्राण्यांच्या कुजक्या-सडक्या प्रेतांवर ते गुजराण करतात. खरे पाहता वाघसिंहांनी ठार मारलेले जनावर, त्यांचे खाणे झाल्यावर गिधाडे व कोल्हे ताब्यात घेऊन खातात. त्यांचेदेखील खाऊन झाल्यावर उरलीसुरली हाडे व त्यांना घट्ट चिकटलेले कडकडीत मांस तरस खातात. तरसांचा बळकट जबडा व मोठे मजबूत दात हाडे फोडण्यासाठी आणि चघळण्यासाठी उपयोगी पडतात. तरस, कोल्हे आणि गिधाडे जंगलात आपोआप मेलेल्या आणि कोणीतरी मारलेल्या प्राण्यांचे सडके-कुजके मांस खातात. त्यामुळे जंगले स्वच्छ राहातात.



नाहीतर जिकडे-तिकडे घाण सुटली असती. हे खाणे तरस रात्री, तर गिधाडे दिवसा खातात. म्हणून गिधाडे आणि तरस यांची भेट सहसा होत नाही.

तरसाचे मागचे पाय बारीक असतात. त्यामध्ये पुरेसा जोर नसतो. म्हणून हे जनावर खुरडत खुरडत चालल्यासारखे वाटते. कधी कधी भक्ष्य शोधण्यासाठी तरसे फिरत फिरत गावाच्या जवळपास येतात. तरसे जरी सडकी, कुजकी प्रेते खात असली तरी केव्हा केव्हा संधी मिळाल्यास गावातून वासरू, शेळी, मेंढी, पाळीव कुत्रे अशासारखे पाळीव प्राणी मारून पळवावयास मागेपुढे पाहात नाहीत. तरसे माणसाला घाबरून असतात. ती दिवसाउजेडी सहसा मनुष्यवस्तीत येत नाहीत. परंतु एकटे दुकटे मूल कधी कधी तरसांनी पळविल्याची अथवा एकट्या दुकट्या बाईवर तरसांनी हल्ला चढविल्याची उदाहरणे आहेत. एकंदरीत तरस हा प्राणी घाणेरडा असला तरी एक प्रकारे गावाचा उकिरडा साफ करण्याचे काम करतो. भारतातील काही भागांत तरसाची जीभ आणि चरबी औषधी आहे असे समजतात. चरबीचा उपयोग सांधेदुखीवर आणि जिभेचा उपयोग गाठ आणि सूज यांवर होतो.

आपापसात ती केव्हा केव्हा रडल्यासारखा, तर केव्हा केव्हा मोठमोठ्याने हसल्यासारखा आवाज काढतात. तरसांच्या कित्येक जोड्या रात्र पडली की भक्ष्यांच्या शोधार्थ बाहेर पडतात आणि दिवस उगवण्यापूर्वी आपल्या गुहांमध्ये परत येतात. केव्हा केव्हा तरस एकत्रपणे भक्ष्याच्या शोधार्थ मैलच्या मैल तुडवितात. त्यांच्या पावलांचे ठसे कुत्र्याच्या पावलांच्या ठशासारखे दिसतात. फक्त पुढील पायांचे ठसे अधिक स्पष्ट दिसतात तर मागील पायांचे ठसे फारच अस्पष्ट दिसतात.

तरसाला एका वेळेस ३–४ पिले होतात. पिलांचे डोळे जन्मतःच बंद असतात. पिले लहान असतानादेखील त्यांच्या अंगावर आडवे पट्टे असतात. शरीरावर पांढरट मऊ केस असतात. परंतु मानेवर पूर्ण वाढलेल्या तरसासारखे आयाळीचे केस नसतात. तरस १२ ते १६ वर्षे जगतात.



# ८ अस्वल

भारतात तीन प्रकारची अस्वले दिसतात. त्यांपैकी दोन जातींची अस्वले फक्त हिमालयातच सापडतात. तिसऱ्या जातीला इंग्रजीत 'स्लोथ बेअर' असे म्हणतात. ह्या जातीची अस्वले भारतात सर्वत्र दिसतात. गावोगावी भटकणाऱ्या दरवेशांकडे हीच अस्वले दिसतात.





हे अस्वल काळ्या रंगाचे असून त्याच्या छातीवर V अशा आकाराचा पांढरा पट्टा दिसून येतो. अस्वले साधारणतः दाट जंगलातून आढळून येतात. भरपूर अन्नपुरवठा आणि राहावयाला खडक-कपारींच्या जागा त्यांना फार आवडतात. गुहेतही ती राहातात. दिवस मावळण्यापूर्वी ती खाद्याच्या मागावर बाहेर पडतात. ती रात्रभर बाहेर भटकतात आणि दिवस उगवताना विश्रांतीसाठी गुहेत येतात. थंड व ढगाळ हवा असल्यास ती दिवसभर बाहेर असतात. वेगवेगळ्या प्रकारची फळे आणि कीटक, मुंग्या, वाळवी असे त्यांचे मुख्य खाद्य असते. बरेच दिवस खाण्यास न मिळाल्याने भुकेने व्याकूळ झालेले अस्वल केव्हा केव्हा कुजके मासदेखील खायला मागेपुढे पाहात नाही. एखादे वेळेस ते प्राणी ठार मारून त्यांचे मास खाते. अस्वले आपल्या हातांच्या विळख्यात प्राण्याला घट्ट पकडून गुदगुल्या करून ठार मारते अशी समजूत आहे. पण ती समजूत खरी नाही. अस्वले आपल्या पंजांनी आणि लांब, मजबूत नख्यांनी भक्ष्याला फाडून मारतात.

आपले मोठे पोट भरण्यासाठी केव्हा केव्हा त्याला फार पायपीट करावी लागते. उन्हाळ्यात त्यांची आपल्या इथल्या जंगलातून चंगळ असते. कारण ह्या दिवसात त्यांना वड, पिंपळ, उंबर, आंबा, जांभूळ, बेल इत्यादींच्या फळावर ताव मारण्यास मिळतो. शिवाय ह्या दिवसात कित्येक झाडांवर मधमाशांची पोळीदेखील मधाने भरलेली असतात. अस्वल झाडावर फळे खावयास चढले असताना त्याच्या दृष्टीस असे एखादे पोळे पडले की ते त्यावर आपल्या पंजाचा फटकारा मारून झाडावरून सरसर खाली उतरते आणि पोळ्यातून गळावयाला लागलेला मध पिऊन घेते. त्याच्या अंगावर

असलेल्या दाट केसांच्या जंजाळातून मधमाशा त्याच्या शरीरापर्यंत पोचणे कठीणच.

पावसाळ्यामध्ये त्यांना दाट जंगलातील झाडांच्या ढोलीमध्ये, लाकडांच्या ओंडक्याखाली, पालापाचोळ्याखाली लपलेले वेगवेगळ्या प्रकारचे किडे आणि कीटक खावयास मिळतात. त्यांना वाळवी फारच आवडते. कित्येकदा अस्वले जमीन उकरून तिच्यात असलेली भुंगीऱ्यांची पोरे खातात. पावसाळ्यानंतर ते कित्येकदा उसाचे मळे, मक्याची कणसे यांवर आपला मोर्चा वळवितात. अस्वलांना खजूरदेखील अतिशय आवडतो. शिवाय खजूर, शिंदी, ताड या झाडांवर चढून ते त्या झाडांपासून ताडीसारखा निघणारा रसदेखील पितात. काहीच मिळाले नाही तर त्यांना बोरेदेखील चालतात.

मार्च-एप्रिलच्या सुमारास नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर येथील जंगलात मोहाची झाडे फुलतात. तेव्हा मोहाची ही पिवळीधम्मक फुले वाऱ्याने गळून जमिनीवर त्यांचा सडा पडतो. या फुलांचा घमघमाट सर्वत्र दरवळतो. अस्वलाची स्वारी तेव्हा तिकडे वळते. ही फुले त्यांना फारच आवडतात. ही फुले पोटभर खाऊन झिंगून मग स्वारी तेथेच सावलीला आडवी होते.

अस्वले साधारणतः एकटी किंवा जोडीने राहातात. उन्हाळ्यामध्ये नर आणि माद्या एकत्र येतात. हिवाळ्याच्या सुरुवातीला त्यांना पिले होतात. अस्वलाचे नाक अतिशय तिखट असते. नजर मात्र फारच अधू असते. त्याच्या बोजड शरीराच्या मानाने त्याचे डोळे फारच बारीक असतात. त्याच्या शरीरावर अतिशय दाट केस असल्याने त्याचे स्पर्शज्ञानही



अगदीच कमी असते. त्यामुळे सर्वसाधारणतः त्याची गणना चपळ व हुशार प्राण्यांमध्ये होत नाही. ते केव्हा काय करील, कुठे कसे वागेल, याबद्दल आपल्याला अंदाज येऊ शकत नाही. त्याच्या बुद्धीचा फारसा विकास झालेला नसतो. तरीही शिकविले असता ती सर्कशीत अथवा प्राणिसंग्रहालयामध्ये कामे करू शकतात. अस्वले पाण्यात उत्तम पोहतात. अस्वलाचे आयुष्य ४० ते ५० वर्षे असते.

---